**महाराष्ट्र महामार्ग अधिनियमाखालील भूमिसंपादन व जमीन एकत्रीकरण योजना यासाठी आस्थापना शुल्क व सोयीसुविधा शुल्क लागू करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक : खाक्षेस-२०१६/प्र.क्र.२५१ (एल.बी.६०)/रस्ते-८**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : २८ जानेवारी, २०२०.

वाचा :- १) शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग क्रमांक-एलक्यूएन-१२/२०१३/प्र.क्र.१९०/अ-२ दि.१९ मार्च, २०१४
२) शासन आदेश, सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक-खाक्षेस-२०१६/ प्र.क्र.२५१ (एल.बी.१३)/ रस्ते-८ दि.२९ मे, २०१८.
३) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्रमांक- संकिर्ण-०५/२०१७/प्र.क्र.७१/अ-२ दि.०३ नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र महामार्ग अधिनियम (१९५५ चा ५५) हा राज्यातील महामार्ग विषयक कामकाजासाठी तयार करण्यात आला आहे. सदर अधिनियमाच्या प्रकरण-तीन च्या कलम १५ ते १९-ड मध्ये भूमिसंपादनाबाबत तरतुदी समाविष्ट आहेत. महाराष्ट्र महामार्ग (सुधारणा) अधिनियम, २०१६ (२०१६ चा २८) याच्या प्रकरण-तीन-अ च्या कलम १९-फ ते कलम १९-डब्ल्यू मध्ये जमीन एकत्रीकरण योजनेबाबत तरतुदी समाविष्ट आहेत. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भाधीन दिनांक २९ मे, २०१८ रोजीच्या शासन आदेशान्वये महाराष्ट्र महामार्ग अधिनियमाच्या कलम १९-ब नुसार भूमिसंपादनासाठी भरपाईची देय रक्कम ठरविण्यास व तदनुषंगिक बाबीस मान्यता देण्यात आली आहे.

महाराष्ट्र महामार्ग अधिनियमाखाली जमीन मालक किंवा हितसंबंधित व्यक्ती यांच्यामध्ये करारानुसार अथवा अनिवार्य निवाड्यानुसार भूमिसंपादनाची भरपाईची रक्कम ठरविता येते. जमीन एकत्रीकरण योजनेखाली जमीन मालक किंवा हितसंबंधित व्यक्ती यांच्या योजनेतील ऐच्छिक सहभागाबाबत प्राप्त संमतीद्वारे जमीन ताब्यात घेण्यात येते व जमीन एकत्रीकरण योजनेबाबतच्या शासनाच्या धोरणानुसार त्यापोटी जमीन मालक किंवा हितसंबंधित व्यक्ती यांना विकसित अकृषक भूखंडासह अन्य लाभ अनुज्ञेय करण्यात आले आहेत.

महसूल व वन विभागाने संदर्भाधिन दिनांक १९ मार्च,२०१४ रोजीच्या शासन अधिसूचनेव्दारे भूमिसंपादन, पुनर्वसन व पुनर्वसाहत करताना उचित भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम, २०१३ खालील भूमिसंपादनासाठी आस्थापना शुल्क व सोयी सुविधा शुल्क निश्चित केले आहे.

वरील बाबी विचारात घेऊन, महाराष्ट्र महामार्ग अधिनियमाखालील भूमि संपादन व जमीन एकत्रीकरण योजना यासाठी आस्थापना शुल्क व सोयी सुविधा शुल्क लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र महामार्ग अधिनियमाखालील भूमिसंपादन व जमीन एकत्रीकरण योजना यासाठी खालीलप्रमाणे आस्थापना शुल्क व सोयीसुविधा शुल्क निश्चित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) महाराष्ट्र महामार्ग अधिनियमाखालील भूमिसंपादनासाठी करारानुसार अथवा अनिवार्य निवाडयानुसार देय रक्कमेच्या २% आस्थापना शुल्क व ०.७५% सोयी सुविधा शुल्क आकारण्यात यावे.

२) महाराष्ट्र महामार्ग अधिनियमाखालील जमीन एकत्रीकरण योजनेसाठी जमीन मालक किंवा हितसंबंधित व्यक्ती यांच्या योजनेतील ऐच्छिक सहभागाबाबत प्राप्त संमतीद्वारे विहितरित्या अंतिमत: ताब्यात घेण्यात आलेल्या जमिनीच्यापोटी शिघ्रसिद्धगणकानुसार त्या जमिनीच्या मूल्यांकनाच्या २% आस्थापना शुल्क व ०.७५% सोयीसुविधा शुल्क आकारण्यात यावे.

३) जिल्हाधिकारी तथा सक्षम प्राधिकारी व भूमिसंपादन अधिकारी यांनी भूमिसंपादन व जमीन एकत्रीकरण योजना यासाठी जमा करण्यात आलेल्या आस्थापना शुल्क व सोयीसुविधा शुल्क याचा विनियोग महसूल व वन विभागाच्या संदर्भाधिन दिनांक १९.०३.२०१४ रोजीच्या शासन अधिसूचनेमध्ये व तद्नुषंगिक निर्गमित शासन निर्णय / परिपत्रक यामध्ये विहित कामकाजासाठी विहित रीतीने करावा. तसेच सदर आस्थापना शुल्क व सोयी सुविधा शुल्क याच्या विनियोगाबाबत स्वीय प्रपंजी लेख्याचा योग्य लेखाजोखा ठेवण्यात यावा.

सदर शासन निर्णय महसूल व वन विभागाच्या दिनांक ०७.०३.२०१९ रोजीच्या अनौपचारिक संदर्भान्वये आणि वित्त विभागाच्या दिनांक ०३.०४.२०१९ व दिनांक ३०.०८.२०१९ रोजीच्या अनौपचारिक संदर्भान्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२८१४५९११९४१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Salunke Bapurao Popatrao

Digitally signed by Salunke Bapurao Popatrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=edca8a98bda16cdd38ff242769798f5e5400f388f008 87df293e26ebd101bda6, serialNumber=e7530ea4ce1b9c2035e21cb89b458d475feb68 82fc088c831b3e5c624de70c81, cn=Salunke Bapurao Popatrao
Date: 2020.01.28 15:01:39 +05'30'

( बी. पी. साळुंके )
उप सचिव (खा.र.१)

**प्रत,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
८) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१४) महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
१७) सर्व विभागीय आयुक्त.
१८) सर्व जिल्हाधिकारी.
१९) संचालक, नगर रचना, पुणे.
२०) सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
२१) सर्व मंत्रालयीन विभाग.
२२) सर्व कोषागार अधिकारी,
२३) सर्व कार्यासने, सार्वजनिक बांधकाम विभाग.
२४) निवड नस्ती (रस्ते-८), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.